**वैद्यकीय अधिकारी, स्त्री रोग व प्रसुती तज्ञ या संवर्गातील पदावर तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नतीने देण्यात आलेल्या पदस्थापनेमध्ये तात्पुरता संवर्ग बदल करुन सुधारीत पदस्थापना देण्याबाबत.**

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन आदेश क्रमांकः पदोन्न-११२२/प्र.क्र.२८४(३)/सेवा-२

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार संकुल इमारत १० वा मजला
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१

दिनांक : २१ फेब्रुवारी, २०२३

**संदर्भ :** सा. आ. वि., शासन आदेश क्र.पदोन्न-११२१/प्र.क्र.३१६/सेवा-२, दि.०१ ऑगस्ट, २०२२.

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ मधील "वैद्यकीय अधिकारी" या संवर्गात कार्यरत अधिकाऱ्यांना वैद्यकीय अधिकारी, स्त्री रोग व प्रसुती तज्ञ या संवर्गातील पदावर संदर्भाधीन शासन आदेशान्वये तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आलेली आहे. सदर शासन आदेशातील खालील वैद्यकीय अधिकारी यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेमध्ये त्यांच्या विनंतीनुसार स्तंभ क्र. (४) मध्ये दर्शविल्याप्रमाणे तात्पुरता संवर्ग बदल करुन जिल्हा शल्य चिकित्सक/ जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गांत सुधारीत पदस्थापना देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | संदर्भीय शासन आदेशानुसार पदोन्नतीनंतरची पदस्थापना | पदोन्नतीनंतरची तात्पुरता संवर्ग बदल करुन सुधारीत पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | **डॉ. राजीव संभाजी घोडके,** वैद्यकीय अधिकारी, ग्रामीण रूग्णालय, समशेरपूर, अहमदनगर | वैद्यकीय अधिकारी, स्त्रीरोग व प्रसुती तज्ञ, जिल्हा रूग्णालय, अहमदनगर | **वैद्यकीय अधीक्षक, ग्रामीण रूग्णालय, समशेरपूर, जि. अहमदनगर** |
| २. | **डॉ. कविता माणिकराव पाटील (कोरे),** वैद्यकीय अधिकारी, जिल्हा रूग्णालय, औंध, पुणे | वैद्यकीय अधिकारी, स्त्रीरोग व प्रसुती तज्ञ, स्त्रीरूग्णालय, बारामती | **वैद्यकीय अधिकारी, स्त्री रोग व प्रसुती तज्ञ, सामान्य रुग्णालय, औंध, पुणे** |
| ३. | **डॉ. ज्ञानेश्वर दुर्भाटकर** वैद्यकीय अधिकारी, उ.जि.रु, सावंतवाडी, सिंधुदुर्ग | वैद्यकीय अधिकारी, स्त्रीरोग व प्रसुती तज्ञ, सामान्य रुग्णालय, सिंधुदूर्ग | **वैद्यकीय अधीक्षक, उप जिल्हा रूग्णालय, सावंतवाडी, सिंधुदूर्ग** |
| ४. | **डॉ. भारती खंडेलवाल,** वैद्यकीय अधिकारी, पोलिस रुग्णालय, भायखळा, मुंबई | वैद्यकीय अधिकारी (स्त्रीरोग व प्रसुती तज्ञ) मध्यवर्ती रुग्णालय, उल्हासनगर | **वैद्यकीय अधीक्षक, नागरी संरक्षण संचालनालय, मुंबई** |

| अ. क्र. | वैद्यकीय अधिकाऱ्यांचे नाव व पदनाम | संदर्भीय शासन आदेशानुसार पदोन्नतीनंतरची पदस्थापना | पदोन्नतीनंतरची तात्पुरता संवर्ग बदल करुन सुधारीत पदस्थापना |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| ५. | **डॉ. उज्वला शिवाजीराव बादाडे,** वैद्यकीय अधिकारी, उप जिल्हा रुग्णालय, उदगीर, जि. लातूर | वैद्यकीय अधिकारी (स्त्रीरोग व प्रसुती तज्ञ), उप जिल्हा रुग्णालय, उदगीर, लातूर | **सहायक संचालक (वैद्यकीय), उपसंचालक लातूर मंडळ, लातूर** |

२. पदोन्नतीबाबतच्या अन्य अटी व शर्ती संदर्भाधीन शासन आदेशात नमूद केल्याप्रमाणे राहतील. त्याचबरोबर वरीलप्रमाणे देण्यात आलेली सुधारीत पदस्थापना परिच्छेद- ३ मधील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**३. उपरोक्त अधिकाऱ्यांना निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीद्वारे अथवा महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गातील पदावर अधिकारी उपलब्ध होईपर्यंत, प्रशासकीय सोय म्हणून तात्पुरता संवर्ग बदलून सुधारीत पदस्थापना देण्यात येत आहे. त्यामुळे जिल्हा शल्य चिकित्सक संवर्गात अधिकारी उपलब्ध झाल्यानंतर संवर्ग बदलुन पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या मुळ विशेषज्ञ संवर्गात पदस्थापना दिली जाईल. तसेच त्यांची सेवा जेष्ठता विशेषज्ञ संवर्गातच गृहीत धरली जाईल.**

४. सदरहू आदेश तात्काळ अंमलात येतील.

५. वरील अधिकाऱ्यांपैकी ज्या अधिकाऱ्यांना मूळ पदस्थापना आदेशानुसार कार्यमुक्त केल्यानंतर ते पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होऊ शकले नाहीत, अशा अधिकाऱ्यांना प्रशासकीय कारणास्तव देय/अनुज्ञेय रजा (वैद्यकीय प्रमाणपत्रा शिवाय) मंजूर करण्याची कार्यवाही संबंधित कार्यालय प्रमुख/ प्रादेशिक कार्यालय प्रमुख यांनी करावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२०१३३२४५२५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHIVDAS MAHADEO DHULE

Digitally signed by SHIVDAS MAHADEO DHULE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd353a6a1af02b28757a9a542f2f807ba45954 3ed19dc809f2f150cfde4470c9, pseudonym=FFAC916764FCC27FA561F44ED9FF58B3 C8CD943C, serialNumber=55231903025208911890F58514593563 E9788A66733F9A7E0D1A454083659841, cn=SHIVDAS MAHADEO DHULE
Date: 2023.02.21 15:23:26 +05'30'

(शि. म. धुळे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा. उप मुख्यमंत्री महोदयांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई.
५. संचालक, आरोग्य सेवा (२), पुणे.
६. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
७. सह संचालक, आरोग्य सेवा (सर्व).
८. सह संचालक, आरोग्य सेवा (अ. व प्र.) मुंबई
९. उप संचालक, आरोग्य सेवा मंडळ (सर्व)
१०. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय (सर्व)
११. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर.
१२. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१४. प्रधान सचिव, सा. आ. विभाग, मंत्रालय यांचे स्विय सहायक
१५. सचिव (२), सा. आ. विभाग, मंत्रालय यांचे स्विय सहायक
१६. सर्व संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा (१), मुंबई यांचे मार्फत)
१७. निवडनस्ती सेवा-२

***************